कोषागारात रोख देय अनुदान

**अर्थसंकल्पीय अनुदान २०१०-११**

**विशेष घटक योजना (मागणी क्र. वाय-२ लेखाशीर्ष** २२१५१८०७) उच्च क्षमतेच्या विंधण विहिरींवर विद्युतपंप बसविणे, हातपंप /विद्युतपंप देखभाल दुरुस्ती व कमी क्षमतेच्या विंधण विहिरीचे जलभंजन करणे या कार्यक्रमासाठी अनुदान मुक्त करणेबाबत

**महाराष्ट्र शासन**

पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

शासन निर्णय क्र. बीयुडी-१०१० /प्र.क्र.१३३/पापु-१५

मंत्रालय, मुंबई -३२, दिनांक- **३० एप्रिल,२०१०**

वाचा:- १. शासन निर्णय, ग्राम विकास विभाग, शासन निर्णय क्र. ग्रापापु-१०८९ /सीआर २६८९/४३, दिनांक १७ जानेवारी १९९०

२.शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शासन निर्णय क्र. भूजल १०९८/प्र.क्र.४६५/पापु१५ दि.१६ ऑक्टोबर, १९९८

३.वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अंदाज -२०.१०/सीआर ६५/अर्थसंकल्प ३ दि.३ एप्रिल २०१०

**प्रस्तावना:-**

उच्च क्षमतेच्या विंधण विहिरीवर पुरेश्या पाण्याच्या उपलब्धतेची निदान ८-१० वर्षे शाश्वती , संबंधित गावात/वस्त्यात अशा प्रकारच्या उच्च क्षमतेच्या विंधण विहिरींवर विद्युतपंप बसविण्याची आवश्यकता, याबाबी विचारात घेऊन विद्युतपंप बसविण्याचा कार्यक्रम राबविण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. या कार्यक्रमासाठी गावे/वाडयांची निवड करण्याकरीता संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये, निकष विहित करण्यात आले आहेत. तसेच विंधन विहिरीवर बसविलेल्या हातपंप व विद्युतपंपाची देखभाल व दुरुस्ती करण्याकरिता आणि पिण्याच्या पाण्यासाठी घेतलेल्या जुन्या विंधण विहिरींचे पुनरुज्जीवन (जलभंजन) करण्याकरिता अवलंबवावयाची कार्यपध्दती व निकष संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये विहित करण्यात आले आहेत.

सन २०१०-२०११ चा अर्थसंकल्प दिनांक २५ मार्च,२०१० रोजी विधानमंडळास सादर करण्यात आला. सदर अर्थसंकल्पावर मागणीनिहाय चर्चा होऊन संपूर्ण अर्थसंकल्पास मंजूरी मिळेपर्यंतचा दोन महिन्याचा खर्च भागविण्यासाठी विधानमंडळाने "महाराष्ट्र विनियोजन (लेखानुदान) विधेयक, २०१०" मंजूर केले आहे. सदर विधेयकाचे अधिनियमात रुपांतर झाले असून ते महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४ म्हणून महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण भाग-४ दि.३१ मार्च,२०१० मध्ये प्रसिध्द करण्यात आल्याचे वित्त विभागाने संदर्भाधीन परिपत्रकान्वये कळविण्यात आले आहे.

सन २०१०-११ या आर्थिक वर्षात ग्रामीण पाणी पुरवठा या जिल्हास्तरीय योजनांतर्गत कार्यक्रमाखालील विशेष घटक योजनेंतर्गत उच्च क्षमतेच्या विंधण विहिरींवर विद्युत पंप बसविणे तसेच



कृ.मागे पहा...

हातपंप/ विद्युतपंप देखभाल व दुरुस्ती आणि विंधण विहिरींचे जलभंजन या कार्यक्रमाकरीता एकूण रु.१७२.८१ लक्ष इतकी तरतूद करण्यात आली आहे. वित्त विभागाच्या संदर्भ क्र.३ येथील परिपत्रकानुसार एप्रिल २०१० व मे २०१० या कालावधीतील खर्च भागविण्यासाठी "२२१५ १८०७" या लेखाशीर्षाखाली रु.२८.८० लक्ष लेखानुदान मंजूर करण्यात आले आहे. सदर लेखानुदान उच्च क्षमतेच्या विंधण विहिरींवर विद्युत पंप बसविणे तसेच हातपंप/ विद्युतपंप देखभाल व दुरुस्ती आणि विंधण विहिरींचे जलभंजन कार्यक्रम राबविणाऱ्या संबंधीत यंत्रणांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय:-**

सन २०१०-११ या आर्थिक वर्षात **उच्च क्षमतेच्या विंधण विहिरींवर विद्युत पंप बसविणे तसेच हातपंप/ विद्युतपंप देखभाल व दुरुस्ती हा कार्यक्रम राबविण्याकरिता मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, यांना रु.२६.९५ लक्ष ( रुपये सव्वीस लक्ष पंच्याण्णव हजार फक्त)** आणि **विंधण विहिरींचे जलभंजन हा कार्यक्रम राबविण्यासाठी संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांना रु. १.८५ लक्ष (रुपये एक लक्ष पंच्याऐंशी हजार फक्त) या प्रमाणे एकूण रु.२८.८० लक्ष (रुपये अठ्ठावीस लक्ष ऐंशी हजार फक्त) एवढे अनुदान मंजूर करण्यात येत असून सोबतच्या विवरणापत्रातील स्तंभ-४, ६ व ८ मध्ये दर्शविलेल्या वाटपानुसार अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात येत आहे.**

२. उपरोक्त मंजूर अनुदानातून उच्च क्षमतेच्या विंधण विहिरीवर विद्युत पंप बसविण्याचा कार्यक्रम , हातपंप/ विद्युतपंप देखभाल व दुरुस्ती आणि विंधण विहिरींचे पुनरुज्जीवन (जलभंजन ) हे कार्यक्रम संदर्भ क्र.१ व २ येथे नमूद शासन निर्णयातील विहित कार्यपध्दती व अटी व शर्तीच्या अधीन राहुन राबविण्यात यावेत. सदर अनुदान खर्च करतांना पुढील सुचनांचे पालन करावे.

१. हे अनुदान ज्यासाठी मंजूर करण्यांत आले आहे त्या विनिर्दिष्ट प्रयोजनासाठीच खर्च करावे.
२. या अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावे.
३. या कार्यक्रमांतर्गत घेतलेल्या कामांचा भौतिक व आर्थिक प्रगती अहवाल मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषद तसेच संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांनी शासनास दर महिन्याच्या ५ तारखेपर्यंत न चुकता सादर करावा.
४. वरील मंजूर अनुदानाची उपयोगिता प्रमाणपत्रे शासनाकडे विहित प्रपत्रात सादर करण्यात यावी.
५. तसेच मासिक विवरणपत्रानुसार (Cash Flow) अनुदान खर्ची घालण्यात यावे.

३. वरील शर्तीची जिल्हा परिषदेमार्फत पूर्तता होत आहे याची शासनाला खात्री करुन घेता यावी म्हणून महालेखापाल महाराष्ट्र- मुंबई (१), किंवा महालेखापाल महाराष्ट्र- नागपूर (२) यांना लेखा परिक्षणाकरीता जिल्हा परिषदांची लेखे व पुस्तके पाहण्याचा अधिकार राहील व महालेखापाल यांना त्यांचे काम योग्य तऱ्हेने पार पाडता यावे म्हणून जिल्हा परिषदा त्यांना संपूर्ण मदत व सुविधा पुरवतील.

४. शासन परिपत्रक, ग्राम विकास विभाग क्र.आरसीएन १०८९/सीआर-३०२७/२८, दिनांक ५.९.१९९० मधील सुचनांप्रमाणे या अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदलेल्या खर्चाबरोबर मेळ घालण्यात यावा व विहीत अहवाल शासनाकडे जिल्हा परिषदांनी सादर करावेत.

५. या बाबतचा खर्च "मागणी क्र. वाय- २, २२१५-पाणी पुरवठा व स्वच्छता- ०१ पाणी पुरवठा- १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम-(डी)अनुसूचित जातीकरीता विशेष घटक योजना- पिण्याचे पाणी

पुरवठ्याचा ग्रामीण कार्यक्रम-(०२)(१२) वीजपंप बसविणे/हातपंपाचे विद्युतपंपात रुपांतर करणे (२२१५-१८०७)" या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व त्या शीर्षाखाली २०१०-११ या आर्थिक वर्षामध्ये मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा .

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या WWW.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र.२०१००५०३१४५३१४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

सही-

**(श.वि.दुर्वे)**

**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. विभागीय आयुक्त, कोकण, नाशिक, पुणे. औरंगाबाद
२. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे, नाशिक, जळगाव,अहमदनगर, सातारा, सोलापूर, कोल्हापूर, बीड,
४. उप संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे, नाशिक
५. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, ठाणे, नाशिक, जळगाव,अहमदनगर, सातारा, सोलापूर, कोल्हापूर, बीड,
६. वरीष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, जळगाव, अहमदनगर, सोलापूर
७. उपअभियंता (यां), ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, ठाणे, नाशिक, जळगाव,अहमदनगर, सातारा, सोलापूर, कोल्हापूर, बीड,
८. कोषागार अधिकारी , ठाणे, नाशिक, जळगाव,अहमदनगर, सातारा, सोलापूर, कोल्हापूर, बीड,
९. महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
१०. महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
११. मुख्य लेखा परिक्षक स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
१२. उपमुख्य लेखा परिक्षक स्थानिक निधी लेखा, कोकण, नाशिक, पुणे. औरंगाबाद,
१३. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील कार्यासने पापु-०४, पापु-०५ , पापु ०७ व पापु-२०
१५. निवड नस्ती पापु-१५

Grant for SCP - Power pump 2009-10.xls